नगर विकास विभागाच्या आस्थापनेवरील
नगर रचनाकार संवर्गातील अधिकाऱ्यांच्या
मध्यावधी बदल्या/ प्रतिनियुक्ती बाबत...

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग,**
**शासन आदेश क्रमांक : बदली-५८२०/प्र.क्र.५९/२०२०/नवि-२७,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
चौथा मजला, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
**दिनांक : २२ सप्टेंबर, २०२०.**

**वाचा : शासन आदेश क्रमांक : बदली-५८२०/प्र.क्र.५९/२०२०/नवि-२७, दि.१८.०३.२०२०.**

**शासन आदेश :-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ४ (४) (दोन) व कलम ४ (५) मधील तरतुदींनुसार तसेच महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ मधील परिशिष्ट-तीन, नियम ४० (१) (२) (३) (४) व परिशिष्ट-दोन मधील अटी व शर्तीनुसार प्रशासकीय कारणास्तव खालील विवरणपत्रात दर्शविण्यात आल्यानुसार नगर विकास विभागाच्या आस्थापनेवरील **नगर रचनाकार (गट-अ/ राजपत्रित) (वेतनश्रेणी : (एस-२०) रु.५६१००-१७७५००)** या संवर्गातील अधिकाऱ्यांची मध्यावधी बदली / प्रतिनियुक्तीने पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नांव | सध्या कार्यरत ठिकाण | बदली/प्रतिनियुक्ती नंतरचे कार्यालय |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री.अ.कृ.रायमाने | नगर रचनाकार, वर्ग-१, मूल्यांकन तज्ञ, ठाणे | सहायक संचालक, नगर रचना, ठाणे शाखा |
| २ | श्री.अ.पां.गुरगुळे | उप संचालक, नगर रचना, विकास योजना, विशेष घटक, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका | उल्हासनगर महानगरपालिका (शा.आ.) |

०२. श्री.अ.कृ.रायमाने यांची दि.१८.०३.२०२० च्या आदेशान्वये उल्हासनगर महानगरपालिका (शा.आ.) येथे केलेली बदली याव्दारे रद्द करण्यात येत आहे.

०३. उपरोक्त अधिकाऱ्यांपैकी ज्या अधिकाऱ्यांची पदस्थापना प्रतिनियुक्तीने असेल, त्यांना प्रतिनियुक्तीच्या विहित अटी व शर्ती लागू राहतील.

०४. उपरोक्त अधिकारी ज्या कार्यालयात कार्यरत आहेत, त्या कार्यालय प्रमुखांनी हे आदेश प्राप्त होताच वरील अधिकाऱ्यांना बदलीने/प्रतिनियुक्तीने पदस्थापना करण्यात आलेल्या ठिकाणी रुजू होण्याकरिता तात्काळ कार्यमुक्त करावे.

०५. या आदेशान्वये प्रतिनियुक्तीने पदस्थापना करण्यात आलेल्या अधिकाऱ्यांनी बदली/प्रतिनियुक्ती झालेल्या ठिकाणी तातडीने रुजू व्हावे व संबंधित अधिकारी बदली/प्रतिनियुक्ती झालेल्या पदावर रुजू झाल्याचा अहवाल संबंधित कार्यालय / संचालक, नगर रचना, पुणे यांनी nitin.shelke@nic.in या ई-मेल पत्त्यावर तात्काळ सादर करावा.

०६. सदरहू आदेशान्वये बदली/प्रतिनियुक्तीने पदस्थापना करण्यात आलेल्या अधिकाऱ्यांनी नियुक्तीच्या ठिकाणी हजर न झाल्यास वा राजकीय दबाव आणून बदली रद्द करण्याचा प्रयत्न केल्यास त्याची संबंधित अधिकाऱ्यांच्या गोपनीय अहवालात नोंद घेण्यात येईल. तसेच राजकीय दबावाबाबतची कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील नियम ३ (३) व २३ चे उल्लंघन करणारी असल्यामुळे ती गैरवर्तणूक समजून संबंधितांविरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल, याची नोंद घेण्यात यावी.

०७. सदर शासन आदेश, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक **२०२००९२२१६५२१९९५२५** असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Digitally signed by VIJAY KARBHARI CHAUDHARI
Date: 2020.09.22 17:33:56 +05'30'

**(विजय चौधरी)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

संबंधित अधिकारी यांना,

**प्रत :-**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव
२. मा.मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.उपमुख्यमंत्री महोदयांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा.मंत्री/मा.राज्यमंत्री, नगर विकास महोदयांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा.सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
६. मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
७. मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
८. मा.उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
९. मा.उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई

१०. सर्व सन्माननीय विधानपरिषद/विधानसभा सदस्य
११. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.
१२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.
१३. महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.
१४. महालेखापाल (लेखा परीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.
१५. प्रधान सचिव (नवि-१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७. विभागीय आयुक्त, कोकण विभाग, नवी मुंबई.
१८. विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे.
१९. आयुक्त, उल्हासनगर महानगरपालिका, उल्हासनगर.
२०. आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका.
२१. जिल्हाधिकारी, ठाणे/पुणे.
२२. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-४११ ००१. (३-प्रती)
२३. सर्व सह संचालक, नगर रचना
२४. उप संचालक, नगर रचना, विकास योजना, विशेष घटक, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका.
२५. सहायक संचालक, नगर रचना, ठाणे शाखा
२६. जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे/पुणे.
२७. निवडनस्ती/नवि-२७.

***